**सुधारित प्रशासकीय मान्यता (TRIBAL)**
**गडचिरोली जिल्ह्यातील वैरागड - डोंगरतमासी मार्गावरील (ग्रा.मा.७८) खोब्रागडी नदीवरील मोठ्या पुलाचे बांधकाम करणे**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक - सुप्रमा-२००८/प्र.क्र.३२/रस्ते-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ नोव्हेंबर, २००९

**पहा -** १) शासन निर्णय क्रमांक- ग्रामा-३९०४/सीआर-२४७/पी-३, दि. १२/२/२००४.
२)मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांचे पत्र क्रमांक - का-नियोजन ४३९३ दि. ०७/१०/२००८

## शासन निर्णय

मुख्य अभियंता सा.बां.प्रा. विभाग, नागपूर, यांचेकडून उपरोक्त कामाची सुधारीत अंदाजपत्रके सुधारित प्रशासकीय मान्यतेकरीता संदर्भाधिन अनुक्रमांक २ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाली होती. मुख्य अभियंता सा.बां प्रा. विभाग, नागपूर, यांचेकडुन प्राप्त प्रस्तावानुसार त्यांनी सादर केलेली कारणमिमांसा व अभिप्राय विचारात घेउन आता या शासन निर्णयाद्वारे विषयाधिन कामाच्या रु. २,७४,००,०००/- (रूपये दोन कोटी, चौऱ्याहत्तर लक्ष फक्त ) एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

२. सुधारीत प्रशासकिय मान्यता प्राप्त किंमतीतील कामाचा वाव खालील प्रमाणे आहे.

१) मोठापूल
२) पोचमार्ग
३) संकीर्ण बाबी

३. सदर कामावरील खर्च **"मुख्य लेखाशिर्ष ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४- जिल्हा व इतर मार्ग (बिगर अनुशेष) (५०५४ ०४०२) जनजातीक्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना, मागणी क्र. टी-६"** लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक-व्यअस-२००९/प्र.क्र.२८१/अर्थसंकल्प-२, दि.२२/१०/२००९ नुसार मान्यता दिली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक ( 200911131512246001 ) आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(ललितागौरी गिरीबुवा)
**सहाय्यक अभियंता-१ तथा**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**




वित्त विभाग,(व्यय-११)मंत्रालय, मुंबई-४०००३२.
महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई
महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) नागपूर.
महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग , नागपूर
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. – १, गडचिरोली
कार्यासन अधिकारी अर्थ- १/रस्ते -१/४ -अ/नियोजन-१/३ सा. बां. वि. मंत्रालय
नोंदणी शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
कार्यासन रस्ते-५ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.